सहायक मुख्य परीक्षा - 2011



2011 Code : RGM

पेपर क्र. 09

प्रश्नपुस्तिका क्रमांक
**BOOKLET No.**

# प्रश्नपुस्तिका

## मराठी व इंग्रजी

**वेळ : 2 (दोन) तास**

**एकूण प्रश्न : 200**
**एकूण गुण : 200**

## सूचना

(1) सदर प्रश्नपुस्तिकेत **200** अनिवार्य प्रश्न आहेत. उमेदवारांनी प्रश्नांची उत्तरे लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी या प्रश्नपुस्तिकेत सर्व प्रश्न आहेत किंवा नाहीत याची खात्री करून घ्यावी. असा तसेच अन्य काही दोष आढळल्यास ही प्रश्नपुस्तिका समवेक्षकांकडून लगेच बदलून घ्यावी.

(2) आपला परीक्षा-क्रमांक ह्या चौकोनांत **न विसरता बॉलपेनने** लिहावा.

परीक्षा-क्रमांक [ ][ ][ ][ ][ ][ ][ ][ ]
केंद्राची संकेताक्षरे — शेवटचा अंक

(3) वर छापलेला प्रश्नपुस्तिका क्रमांक तुमच्या उत्तरपत्रिकेवर विशिष्ट जागी उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे **न विसरता नमूद करावा.**

(4) या प्रश्नपुस्तिकेतील प्रत्येक प्रश्नाला 4 पर्यायी उत्तरे सुचविली असून त्यांना 1, 2, 3 आणि 4 असे क्रमांक दिलेले आहेत. त्या चार उत्तरांपैकी सर्वात योग्य उत्तराचा क्रमांक उत्तरपत्रिकेवरील सूचनेप्रमाणे तुमच्या उत्तरपत्रिकेवर नमूद करावा. अशा प्रकारे उत्तरपत्रिकेवर उत्तरक्रमांक नमूद करताना तो संबंधित प्रश्नक्रमांकासमोर छायांकित करून दर्शविला जाईल याची काळजी घ्यावी. **ह्याकरिता फक्त काळ्या शाईचे बॉलपेन वापरावे, पेन्सिल वा शाईचे पेन वापरू नये.**

(5) सर्व प्रश्नांना समान गुण आहेत. यास्तव सर्व प्रश्नांची उत्तरे द्यावीत. घाईमुळे चुका होणार नाहीत याची दक्षता घेऊनच शक्य तितक्या वेगाने प्रश्न सोडवावेत. क्रमाने प्रश्न सोडविणे श्रेयस्कर आहे पण **एखादा प्रश्न कठीण वाटल्यास त्यावर वेळ न घालविता पुढील प्रश्नाकडे वळावे.** अशा प्रकारे शेवटच्या प्रश्नापर्यंत पोहोचल्यानंतर वेळ शिल्लक राहिल्यास कठीण म्हणून वगळलेल्या प्रश्नांकडे परतणे सोईस्कर ठरेल.

(6) उत्तरपत्रिकेत एकदा नमूद केलेले उत्तर खोडता येणार नाही. नमूद केलेले उत्तर खोडून नव्याने उत्तर दिल्यास ते तपासले जाणार नाही.

(7) **प्रस्तुत परीक्षेच्या उत्तरपत्रिकांचे मूल्यांकन करताना उमेदवाराच्या उत्तरपत्रिकेतील योग्य उत्तरांनाच गुण दिले जातील. तसेच "उमेदवाराने वस्तुनिष्ठ बहुपर्यायी स्वरूपाच्या प्रश्नांची अचूक उत्तरेच उत्तरपत्रिकेत नमूद करावीत. अन्यथा त्यांच्या उत्तरपत्रिकेत सोडविलेल्या प्रत्येक चार चुकीच्या उत्तरांसाठी एका प्रश्नाचे गुण वजा करण्यात येतील".**

पर्यवेक्षकांच्या सूचनेविना हे सील उघडू नये

## ताकीद

**ह्या प्रश्नपत्रिकेसाठी आयोगाने विहित केलेली वेळ संपेपर्यंत ही प्रश्नपुस्तिका आयोगाची मालमत्ता असून ती परीक्षाकक्षात उमेदवाराला परीक्षेसाठी वापरण्यास देण्यात येत आहे. ही वेळ संपेपर्यंत सदर प्रश्नपुस्तिकेची प्रत/प्रती, किंवा सदर प्रश्नपुस्तिकेतील काही आशय कोणत्याही स्वरूपात प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे कोणत्याही व्यक्तीस पुरविणे, तसेच प्रसिद्ध करणे हा गुन्हा असून अशी कृती करणाऱ्या व्यक्तीवर शासनाने जारी केलेल्या "परीक्षांमध्ये होणाऱ्या गैरप्रकारांना प्रतिबंध करण्याबाबतचा अधिनियम-82" यातील तरतुदीनुसार तसेच प्रचलित कायद्याच्या तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती कमाल एक वर्षाच्या कारावासाच्या आणि/किंवा रुपये एक हजार रकमेच्या दंडाच्या शिक्षेस पात्र होईल.**

**तसेच ह्या प्रश्नपत्रिकेसाठी विहित केलेली वेळ संपण्याआधी ही प्रश्नपुस्तिका अनधिकृतपणे बाळगणे हा सुद्धा गुन्हा असून तसे करणारी व्यक्ती आयोगाच्या कर्मचारीवृंदापैकी, तसेच परीक्षेच्या पर्यवेक्षकीयवृंदापैकी असली तरीही अशा व्यक्तीविरुद्ध उक्त अधिनियमानुसार कारवाई करण्यात येईल व दोषी व्यक्ती शिक्षेस पात्र होईल.**

**पुढील सूचना प्रश्नपुस्तिकेच्या अंतिम पृष्ठावर पहा**

1. 'हजामत करणे' ही क्रिया कोणत्या गोष्टीशी संबंधित आहे ?
(1) चौकशी करणे (2) अजमावून पाहणे
(3) डोक्याचे केस कापणे (4) मत जाणून घेणे

2. 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे' – या वाक्यातील 'वाचाळ' या शब्दाला विरुद्धार्थी असणारा शब्द कोणता ?
(1) शांत (2) अबोल (3) बावळट (4) बालिश

3. शेतातील काम झाल्यानंतर काम करणाऱ्यांना दिल्या जाणाऱ्या भोजनासाठी पुढील कोणता शब्द वापरला जातो ?
(1) सहभोजन (2) इरीरी (3) इल्मी (4) यांपैकी एकही नाही

4. पुढील वाक्यसमूहाच्या स्पष्टीकरणासाठी योग्य म्हणीची निवड करा –
"जेव्हा स्वतः मध्ये मोठा पराक्रम करून
मोठा लाभ करून घेण्याची क्षमता नसते
तेव्हा आपल्या आटोक्यात जेवढे असेल
तेवढ्यावरच संतोष मानून घेणे चांगले."
(1) ताकापुरते रामायण (2) बैल गेला झोपा केला
(3) कोल्हा काकडीस राजी (4) करावे तसे भरावे

5. 'खांडे नवमी' खाली दिलेल्या सणांपैकी कोणत्या सणाशी संबंधित आहे ?
(1) दसरा (2) बेंदूर (3) दिवाळी (4) गुढी पाडवा

6. 'प्रामाणिकपणा' हे __________ आहे.
(1) विशेषनाम (2) सामान्यनाम (3) क्रियापद (4) भाववाचक नाम

7. मोटेचे पाणी जेथे पडते तेथील दगडांनी बांधलेल्या कुंडीवजा जागेला काय म्हणतात ?
(1) थारले (2) थारणे (3) थारोळे (4) थावर

8. "एकाच ठिकाणी असलेल्या माणसांनी एकमेकांची वर्मे काढण्यात अर्थ नसतो; कारण ते एकमेकांना पुरेपूर ओळखत असतात" – या वाक्य समूहातून पुढील कोणती म्हण स्पष्ट होते ?
(1) चोरावर मोर (2) जावे त्याच्या वंशा तेव्हा कळे
(3) चोराच्या उलट्या बोंबा (4) ज्या गावच्या बोरी त्याच गावच्या बाभळी

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

**9.** 'आकाशवाणी' चे दुसरे आणखी एक नाव घेतले जाते ते कोणते ?

(1) मनुष्यवाणी (2) आभाळवाणी (3) नभोवाणी (4) देववाणी

**10.** खालीलपैकी कोणत्या विभक्तीचे प्रत्यय सारखेच आहेत ?

(1) द्वितीया व तृतीया (2) चतुर्थी व षष्ठी

(3) पंचमी व सप्तमी (4) द्वितीया व चतुर्थी

**11.** 'भारताची उन्नती होण्यासाठी विकासाचं जाळं खेड्यापर्यंत पोहोचविण्याची शपथ सर्व शिलेदारांनी घेतली' या वाक्यातील 'उन्नती' या शब्दाचा विरुद्ध अर्थ दर्शविणारा शब्द निवडा.

(1) प्रगती (2) विकास (3) अवनत (4) अवनती

**12.** "सौ. नालिनीताई ह्या आमच्या आता विहीण बाई आहेत" – या वाक्यातील 'विहीण' या शब्दाचे अनेकवचनी रूप ओळखा.

(1) विहिण्या (2) विहिणा (3) विहिणी (4) वाहिन्या

**13.** 'चोर चोरी करून पळून जात असताना पोलिसांनी त्यांला पाहिले' या वाक्यातील 'चोर' या शब्दाचा विरुद्ध अर्थ असलेला शब्द निवडा.

(1) साधू (2) सन्याशी (3) प्रामाणिक (4) साव

**14.** 'क्षेपक' या शब्दाचा अर्थ स्पष्ट करणारा पर्याय निवडा.

(1) क्षेपणास्त्र सोडणारा (2) खळबळ माजविणारा

(3) मूळ ग्रंथात नंतर टाकलेला मजकूर (4) मूळ ग्रंथकार

**15.** 'नैसर्गिक' या शब्दाच्या उलट अर्थाचा शब्द निवडा.

(1) प्राकृतिक (2) स्वाभाविक (3) कृत्रिम (4) सृष्टी

**16.** 'हेमाने दारापुढे ठिपक्यांची सुंदर रांगोळी काढली' – या वाक्यातील अधोरेखित शब्दाचा अव्ययप्रकार ओळखा.

(1) क्रियाविशेषण अव्यय (2) शब्दयोगी अव्यय

(3) उभयान्वयी अव्यय (4) केवल प्रयोगी अव्यय

**17.** 'पोर' या शब्दाचे लिंग ओळखा.

(1) पुल्लिंग (2) स्त्रीलिंग (3) नपुंसक लिंग (4) तिन्ही पर्याय योग्य

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

18. 'दोन कुटुंबांत विवाहसंबंधामुळे निर्माण झालेले नाते' या शब्दसमूहास पुढील पर्यायांतून एक बरोबर पर्याय निवडा.

(1) नातलग (2) सोयरीक (3) आप्तेष्ट (4) ऋणानुबंध

19. 'राजाची स्तुती करणारा' या शब्दसमूहासाठी पुढीलपैकी एक योग्य शब्द सुचवा.

(1) भाट (2) राजकवी (3) शाहीर (4) खुशामतखोर

20. "त्या भिकाऱ्याला मी एक सदरा दिला शिवाय एक रुपयाही दिला" – या वाक्यातील 'शिवाय' हे अव्यय उभयान्वयी अव्ययाच्या कोणत्या प्रकारातील आहे ?

(1) प्रधानत्त्व सूचक (2) गौणत्त्व सूचक

(3) वर्तमानकाळ सूचक (4) क्रियाविशेषण सूचक

21. 'भावनेचा बांध फुटणे' – या वाक्प्रचाराचा योग्य अर्थ कोणता ?

(1) निर्भयपणे सामोरे जाणे (2) भांबावून जाणे

(3) दाबून टाकलेली भावना उफाळून येणे (4) अतूट नाते संबंध तोडणे

22. 'दुराग्रही' हा शब्द पुढीलपैकी कोणत्या शब्दसमूहासाठी निवडता येतो ते सांगा.

(1) हट्टीपणा करणारा (2) आपले मत दुसऱ्याचे मत समजणारा

(3) इतरांच्या मताचा आग्रह धरणारा (4) यांपैकी एकही नाही

23. 'यमक' हा शब्द कशाशी संबंधित आहे ?

(1) दिशा (2) शब्दालंकार (3) गायन (4) प्रदेश

24. 'गुणवंतरावांनी कृषी सेवा दल स्थापन केला' या वाक्यातील अनेक अर्थ असणारा शब्द निवडा.

(1) गुणवंतराव (2) कृषी (3) सेवा (4) दल

25. नामाचे मुख्य तीन प्रकार कोणते ?

(1) सर्वनाम, विशेषण व क्रियापद (2) सामान्यनाम, विशेषनाम व भाववाचकनाम

(3) सर्वनाम, भाववाचकनाम व सामान्यनाम (4) सर्वनाम, भाववाचकनाम व विशेषनाम

26. 'वाणी' या शब्दाचा विविध अर्थ दर्शविणारा शब्दसमूह पुढीलपैकी कोणता ते निवडा.

(1) आकाशवाणी, नभोवाणी, दूरवाणी (2) वाचा, किराणा जिनसांचा दुकानदार, वैश्य

(3) संस्कृतवाणी, देववाणी (4) संतवाणी, लोकवाणी

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

27. 'स्वतः केल्याशिवाय कोणतीही गोष्ट नीट होत नाही' – या वाक्यातील अधोरेखित सर्वनामाचा प्रकार कोणता ?

(1) संबंधी सर्वनाम (2) आत्मवाचक सर्वनाम
(3) दर्शक सर्वनाम (4) सामान्य सर्वनाम

28. 'पवित्र मन, फुल' या विविध अर्थांचा एकत्र शब्द कोणता ते निवडा.

(1) सुमन (2) पुष्प (3) फुलोरा (4) फुलराणी

29. 'एखाद्या वाईट प्रवृत्तीच्या माणसाला कितीही समजावून सांगितले तरी त्याच्यावर काहीही परिणाम होत नाही' – या दृष्टान्तासाठी पुढील म्हणींपैकी कोणती म्हण लागू पडणार नाही ?

(1) सापाला दूध पाजले तरी तो विषच ओकणार
(2) कुत्र्याचे शेपूट नळीत घातले तरी शेवटी वाकडे ते वाकडेच
(3) गाढवापुढे वाचली गीता कालचागोंधळ बरा होता
(4) गवत्या बसला जेवाया आणि ताकासंगे शेवाया

30. 'घरावरुन हत्ती गेला' या वाक्यातील ध्वन्यर्थ ओळखण्यासाठी कोणत्या शब्दशक्तीची मदत होते ?

(1) अभिधा शक्ती (2) लक्षणा शक्ती
(3) व्यंजना शक्ती (4) योग अभिधा शक्ती

31. 'कोण, काय, आपण, स्वतः' – यांची रूपे ________ .

(1) लिंगानुसार बदलणारी असतात (2) वचनभेदानुसार बदलतात
(3) दोन्ही वचनात सारखी राहतात (4) क्रियापदानुसार बदलतात

32. 'मी केशवसूत वाचला' या विधानातील ध्वन्यर्थ कोणता ते खालील पर्यायातून निवडा.

(1) मी समग्र केशवसूत वाचला (2) मी केशवसुतांच्या कविता वाचल्या
(3) मी केशवसुतांविषयीचे साहित्य वाचले (4) मी केशवसुतांचे व्यक्तिमत्व वाचले

33. 'प्रसादने अंगणातील कुत्र्याला दगड मारून हाकलले' – या वाक्यातील अधोरेखित शब्दातील सामान्यरूप ओळखा.

(1) कुत्रा (2) कुत्रे (3) कुत्र्या (4) कुत्री

34. 'कमी आयुष्य असलेला' या शब्दसमूहासाठी कोणता शब्द वापरता येईल ?

(1) अल्पस्वल्प (2) क्षणभंगूर (3) अल्पायुषी (4) कालत्रयी

**35.** "छे ! गरिबांना असे लुबाडणे बरे नव्हे" – या वाक्यातील 'छे' हे केवल प्रयोगी अव्यय कोणती भावना व्यक्त करते ?

(1) तिरस्कार (2) विरोध (3) आश्चर्य (4) शोक

**36.** मराठीत एकूण स्वर किती आहेत ?

(1) आठ (2) दहा (3) बारा (4) चौदा

**37.** पुढीलपैकी स्पर्श व्यंजने कोणती आहेत ?

(1) अ – आ (2) च – छ (3) य – र (4) श – ष

**38.** 'अर्धविराम' हे चिन्ह केव्हा वापरतात ?

(1) एकाच जातीचे अनेक शब्द लागोपाठ आल्यास

(2) दोन शब्द जोडतांना

(3) स्पष्टीकरण द्यावयाचे असल्यास

(4) दोन छोटी वाक्ये उभयान्वयी अव्ययांनी जोडलेली असतांना

**39.** मराठीत कोणता वर्ण स्वतंत्र मानला आहे ?

(1) क् (2) ण् (3) ळ (4) क्ष्

**40.** "शाब्बास ! तुमच्या संघाने आज अंतिम सामना जिंकला व ढालही मिळविली" – या वाक्यातील कर्म ओळखा.

(1) शाब्बास ! (2) सामना व ढाल (3) संघाने (4) अंतिम सामना

**41.** संयुक्त स्वर म्हणजे ________ .

(1) सर्व स्वर एकत्र येणे (2) सर्वांनी मिळून आवाज काढणे

(3) दोन स्वर एकत्र येऊन निर्माण झालेले (4) ऱ्हस्व उच्चार असलेले

**42.** कर्मकर्तरी प्रयोगाचे वाक्य ओळखा.

(1) गाय गुराख्याकडून बांधली जाते (2) त्वा काय कर्म करिजे लघुलेकराने

(3) शिक्षक मुलांना शिकवितात (4) शिक्षकांनी मुलांना शिकवावे

**43.** खालीलपैकी कोणत्या शब्दात व्यंजन संधी साधली आहे ?

(1) कवीश्वर (2) दुरात्मा (3) सज्जन (4) गणेश

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

44. 'मिनतवारी, आर्जव करणे' – या अर्थाचा वाक्प्रचार कोणता ?
(1) खाली मान घालणे (2) दादा-पुता करणे
(3) मान झुकवणे (4) आटा-पिटा करणे

45. 'समिती' हे नाम कोणत्या प्रकारचे आहे ?
(1) विशेषनाम (2) धर्मीवाचकनाम (3) भाववाचकनाम (4) सामान्यनाम

46. 'संस्कार म्हणजे मनावर ताबा व दुसऱ्याच्या दुःखाची जाणीव होय' – या वाक्यातील अधोरेखित शब्द पुढील कोणत्या प्रकारात मोडतो ?
(1) तद्भव शब्द (2) तत्सम शब्द (3) उपसर्ग घटित शब्द (4) देशी शब्द

47. 'ओढा' या शब्दाचे लिंग ओळखा.
(1) पुल्लिंग (2) स्त्रीलिंग (3) नपुंसकलिंग (4) यापैकी नाही

48. 'गजाननाच्या कृपेने कार्यसिद्धी होवो' – या वाक्यातील सामासिक शब्द कोणता ?
(1) गजानन (2) कृपेने (3) कार्यसिद्धी (4) होवो

49. षष्ठी विभक्तीचे प्रत्यय कोणते आहेत ?
(1) चा, ची, चे चा, ची, चे (2) त, ई, आ त, ई, आ
(3) ऊन, हून ऊन, हून (4) ने, ए, शी नी, शी, ई, ही

50. एकच व्यंजन दोन वेळा जोडले गेले की, त्या संयुक्त व्यंजनाला __________ म्हणतात.
(1) अनुनासिक (2) द्वित्त (3) घर्षक (4) अल्पप्राण

51. 'तू' या सर्वनामाचे चतुर्थी विभक्तीतील एकवचनी रूप कोणते आहे ?
(1) तुशी (2) तुजशी (3) तुजला (4) तुझ्यात

52. योग्य विराम चिन्हांचा वापर केलेले वाक्य ओळखा.
(1) मालक म्हणाले, "अरे, तू तूप आणलेस खरे; पण तेल कोठे आहे ? विसरलास वाटते ?"
(2) मालक म्हणाले – "अरे तू, तूप आणलेस खरे, पण तेल कोठे आहे ? विसरलास वाटते !"
(3) मालक म्हणाले, "अरे तू तूप आणलेस खरे पण तेल कोठे आहे ? विसरलास वाटते !"
(4) मालक म्हणाले – "अरे, तू तूप आणलेस खरे ! पण, तेल कोठे आहे ? विसरलास वाटते !"

53. 'आजची पूजा चांगली झाली' या वाक्यात आलेल्या विशेषणाचा प्रकार ओळखा.
(1) अव्ययसाधित विशेषण (2) विधी विशेषण
(3) उत्तर विशेषण (4) नामसाधित विशेषण

54. 'आजचा पेपर खूप सोपा आहे' – या वाक्याचे नकारार्थी वाक्य कोणते ?

(1) आजचा पेपर फार अवघड नाही. (2) आजचा पेपर खूप अवघड नाही.

(3) आजचा पेपर अजिबात अवघड नाही. (4) आजचा पेपर बराचसा अवघड नाही.

55. 'सांजावले', 'मळमळते', 'उजाडले' हे शब्द क्रियापदांच्या कोणत्या प्रकारातील आहेत ?

(1) संयुक्त क्रियापदे (2) भावकर्तृक क्रियापदे

(3) धातुसाधित क्रियापदे (4) सकर्मक क्रियापदे

56. 'अकलेचा खंदक' हा वाक्प्रयोग कोणासाठी वापराल ?

(1) अत्यंत शहाणा माणूस (2) अत्यंत मूर्ख माणूस

(3) अकलेने खंदक खोदणारा (4) अत्यंत श्रीमंत माणूस

57. 'साप माझ्या समोरून गेला' या वाक्यातील क्रियाविशेषणाचा प्रकार ओळखा.

(1) कालवाचक क्रियाविशेषण (2) रीतिवाचक क्रियाविशेषण

(3) स्थलवाचक क्रियाविशेषण (4) गतीवाचक क्रियाविशेषण

58. घरादाराला व देशाला पारखा झालेला.

(1) देशद्रोही (2) फितूर (3) निर्वासित (4) परावलंबी

59. 'भिकाऱ्याला मी एक सदरा दिला; शिवाय त्याला जेवू घातले.' या वाक्यातील उभयान्वयी अव्ययाचा प्रकार ओळखा.

(1) समुच्चयबोधक (2) विकल्पबोधक

(3) न्यूनत्वबोधक (4) परिणामबोधक

60. 'मोठापक्षी आपले सुंदर घरटे उंच झाडावर बांधतो' – या केवल वाक्याचे पृथकरण करा.

(1) उद्देश्य – पक्षी, उद्देश्य विस्तार – मोठा, क्रियापद – बांधतो, कर्म – आपले सुंदर घरटे, विधेय विस्तार – उंच झाडावर

(2) उद्देश्य – मोठा, उद्देश्य विस्तार – पक्षी, क्रियापद – बांधतो, कर्म – आपले सुंदर घरटे, विधेय विस्तार – उंच झाडावर

(3) उद्देश्य – घरटे, उद्देश्य विस्तार – मोठापक्षी, क्रियापद – बांधतो, कर्म – सुंदर, विधेय विस्तार – उंच झाडावर

(4) उद्देश्य – उंच, उद्देश्य विस्तार – मोठापक्षी, क्रियापद – बांधतो, कर्म – सुंदर घरटे, विधेय विस्तार – झाडावर

61. पुढील कोणत्या वाक्यात शब्दयोगी अव्यय आले आहे, ते लिहा.

(1) मी पुस्तक वाचन केले (2) त्याने एक सुंदर कविता वाचली

(3) पतंग वर जात होता (4) टेबलखाली पेन पडला

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

62. 'मुग्धाने फुले तोडली आहेत' – या पूर्ण वर्तमान काळी वाक्याचे अपूर्ण भविष्यकाळी रूप कोणते ?
(1) मुग्धा फुले तोडेन (2) मुग्धा फुले तोडीत असेल
(3) मुग्धाने फुले तोडली असतील (4) मुग्धा फुले तोडीत जाईन

63. सम, सारखा, सहित, समान, योग्य, विरुद्ध हे शब्दयोगी अव्यय ____________.
(1) नामसाधित शब्दयोगी अव्यय आहेत (2) विशेषणसाधित शब्दयोगी अव्यय आहेत
(3) धातुसाधित शब्दयोगी अव्यय आहेत (4) क्रियाविशेषणसाधित शब्दयोगी अव्यय आहेत

64. सर्वनाम हे ____________.
(1) पदार्थाचे नाव सांगते (2) नामाबद्दल विशेष माहिती सांगते
(3) क्रिया दाखवून वाक्याचा अर्थपूरा करते (4) नामाच्या ऐवजी येते

65. 'विलासरावांचा थोरला मुलगा आज क्रिकेटचा सामना चांगला खेळला' या विधानातील विधेय कोणते ?
(1) विलासरावांचा थोरला (2) मुलगा
(3) क्रिकेटचा सामना (4) चांगला खेळला

66. 'यशोधन' या शब्दाचा संधी प्रकार ओळखा.
(1) स्वरसंधी (2) व्यंजनसंधी (3) विसर्गसंधी (4) पूर्वरूपसंधी

67. 'मुलांनो चांगला अभ्यास करा.' या वाक्याचा प्रकार ओळखा.
(1) स्वार्थी (2) आज्ञार्थी (3) विध्यर्थी (4) संकेतार्थी

68. 'या वयात तुला असे बोलणे शोभत नाही ?' – या वाक्यातील अधोरेखित शब्दाची जात ओळखा.
(1) भाववाचक नाम (2) विशेष नाम
(3) धातुसाधित नाम (4) सामान्य नाम

69. 'घंटा वाजली की, शाळा भरते.' या वाक्यातील प्रधान वाक्य कोणते ?
(1) घंटा वाजली (2) की शाळा
(3) की शाळा भरते (4) शाळा भरते

70. केवल प्रयोगी अव्यये ओळखा.
(1) कारण, की, म्हणजे, म्हणून, जर-तर
(2) आणि, व, शिवाय, अन्, परंतु, अथवा
(3) येथे, तेथे, इकडे, तिकडे, चोहीकडे
(4) अबब !, अंग आई, अरे बापरे, अरेरे, हाय हाय

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

71. 'प्रत्येक भारतीयाने भ्रष्टाचारमुक्तीची शपथ घ्यावी.' या वाक्याचा प्रकार सांगा.

(1) स्वार्थी . (2) विध्यर्थी (3) संकेतार्थी (4) आज्ञार्थी

72. अव्ययीभाव समासात

(1) पहिले पद महत्त्वाचे असते
(2) दुसरे पद महत्त्वाचे असते
(3) दोन्ही पदे महत्त्वाची असतात
(4) दोन्ही पदांनी सूचित केलेले वेगळेच पद महत्त्वाचे असते

73. 'आजच्या क्रिकेट सामन्यात सेहवाग खेळला असता तर इंग्लंड संघा विरुद्ध आपण जिंकलो असतो.' या वाक्याचा प्रकार कोणता, ते सांगा.

(1) स्वार्थी (2) आज्ञार्थी (3) विध्यर्थी (4) संकेतार्थी

74. पराक्रम केल्याचा आव आणणारा

(1) ताकपिठ्या (2) ढट्ठाचार्य (3) तिरशिंगराव (4) रणवीर

75. 'चौथे आव्हान हे राजकीय क्षेत्रातील आहे.' हे वाक्य कोणत्या प्रकारातील आहे ?

(1) मिश्र वाक्य (2) संयुक्त वाक्य
(3) केवल वाक्य (4) स्वरूपबोधक वाक्य

76. अनेकवचनी शब्द ओळखा.

(1) गळा (2) शाळा (3) मळा (4) विळा

77. 'दादा थक्कच झाले. पाय न उचलता ते बधत उभे राहोले.' या वाक्याचे केवल वाक्यात रूपांतर कसे होईल ?

(1) दादा थक्कच झाले आणि पाय न उचलताच ते बधत उभे राहीले.
(2) दादा थक्कच झाले. पाय न उचलता बधत उभे राहीले.
(3) दादा थक्कच होऊन पाय न उचलता बधत राहीले.
(4) दादा थक्कच होऊन, बधत राहीले ते पाय न उचलता.

78. 'परभणीला' या शब्दातील विभक्ती ओळखा.

(1) द्वितीया (2) षष्ठी (3) पंचमी (4) सप्तमी

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

**79.** 'दादा घोड्यावर बसले आणि पुन्हा एकदा केरुनाना म्हणाला.' या वाक्याचे मिश्र वाक्यात रूपांतर करा.
(1) दादा घोड्यावर बसले पण पुन्हा एकदा केरुनाना म्हणाला.
(2) केरुनाना म्हणाला, दादा घोड्यावर बसले.
(3) दादा घोड्यावर बसले आणि केरुनाना म्हणाला.
(4) जेव्हा दादा घोड्यावर बसले. तेव्हा पुन्हा एकदा केरुनाना म्हणाला.

**80.** रिकाम्या जागी योग्य शब्द निवडा.
'इंग्रजी वाङ्मयात घुबड हे ज्ञानाचे ________ आहे; पण त्याच घुबडाला आपल्याकडे अशुभ मानतात.'
(1) दान (2) प्रतीक (3) निशाण (4) संबोधन

**81.** 'पाण्यावरले शेवाळ तानूने हाताने सारुन हात-पाय स्वच्छ धुतले.' याचे संयुक्त वाक्य कसे बनवता येईल ?
(1) पाण्यावरले शेवाळ तानूने हाताने सारले तेंव्हा तिला हात-पाय धुता आले.
(2) तानूने शेवाळ सारले, हात-पाय स्वच्छ धुतले.
(3) पाण्यावरले शेवाळ तानूने हाताने सारले आणि हात-पाय स्वच्छ धुतले.
(4) जेंव्हा तानूने शेवाळ बाजूल सारले तेंव्हाच तिने हात-पाय स्वच्छ धुतले.

**82.** मराठी वर्णमालेत एकूण किती वर्ण महाप्राण म्हणून मानले जातात ?
(1) 48 (2) 14 (3) 34 (4) 12

**83.** 'त्याचा धाकटा मुलगा काल अतिरेक्यांविरुद्ध लढताना शहीद झाला.' या वाक्यातील उद्देश्य वाक्य ओळखा.
(1) अतिरेक्यांविरुद्ध (2) लढताना
(3) शहीद झाला (4) त्याचा धाकटा मुलगा

**84.** 'तू एवढ्या भाकरी <u>कराव्यात</u>' – या वाक्यातील अधोरेखित क्रियापदाचा आख्यात ओळखा.
(1) आख्यात (2) वाख्यात
(3) ताख्यात (4) लाख्यात

**85.** पुढील वाक्यातील उद्देश्य विस्तार कोणता ?
'बाभळीच्या काटेदार फांद्यांनी ती गाडी शिगोशिग भरली होती.'
(1) ती गाडी (2) शिगोशिग
(3) भरली होती (4) बाभळीच्या काटेदार फांद्यांनी

**86.** क्रियेविषयी अधिक माहिती सांगणाऱ्या अविकारी शब्दाला ________ म्हणतात.
(1) केवल प्रयोगी अव्यय (2) उभयान्वयी अव्यय
(3) क्रियाविशेषण अव्यय (4) शब्दयोगी अव्यय

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

87. मिश्रवाक्यात एकच प्रधान वाक्य असते. या विधानाला योग्य, तो पर्याय निवडा.
(1) हे विधान बरोबर आहे
(2) हे विधान चूक आहे
(3) हे विधान अंशतः बरोबर नाही
(4) काही सांगता येत नाही

88. 'राजघराण्यात अत्तराचे दिवे लागत होते' -- या वाक्यातील ध्वन्यर्थ ओळखा.
(1) दिव्यात तेला ऐवजी अत्तर घालायचे
(2) दिव्यात अत्तर घातल्याने प्रकाश भरपूर येतो
(3) दिव्यातील तेलाची वात उंदीर पळवून न्यायचे म्हणून
(4) बेसुमार उधळपट्टी करणे

89. 'अपमान केल्यास कुणाला राग येत नाही.' या वाक्याचे होकारार्थी रूप कसे करता येईल ?
(1) अपमान केल्यास कुणाला राग येतो.
(2) अपमान केल्यास प्रत्येकाला राग येतोच.
(3) प्रत्येकाचा अपमान झाला तरी राग येत नाही.
(4) राग येतो जेंव्हा प्रत्येकाचा होतो तेंव्हा.

90. देशी शब्द ओळखा.
(1) रेडा
(2) बॅट
(3) घास
(4) चाक

91. जर दोन वाक्ये ________ नी जोडली तर मिश्र वाक्य तयार होते.
(1) सामान्यनामांनी
(2) सर्वनामांनी
(3) विशेषणांनी
(4) गौणत्वबोधक अव्ययांनी

92. 'च' या वर्गातील च्, छ्, ज्, झ – या वर्णांचा उच्चार ________ असा दुहेरी होतो.
(1) कंठ्य व तालव्य
(2) मूर्धन्य व कंठ्य
(3) तालव्य व दंत तालव्य
(4) दंत्य व औष्ठ्य

93. उद्देशांग व विधेयांग असे दोन भाग कोणत्या वाक्यप्रकारांचे केले जातात ?
(1) केवल वाक्य
(2) मिश्र वाक्य
(3) संयुक्त वाक्य
(4) वरील सर्व

94. 'साहेब' हा शब्द मराठीत कोणत्या भाषेतून आला आहे ?
(1) इंग्रजी (2) अरबी (3) पोर्तुगीज (4) हिंदी

कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK

**95.** दुधात साखर पडणे – या म्हणीसाठी कोणता अर्थ योग्य आहे ?
(1) आनंदात भर पडणे (2) दुधाने तोंड पोळणे
(3) ताक फुंकून पिणे (4) यांपैकी एकही नाही

**96.** पोटात शूळ उठणे – या म्हणीचा अर्थ खालील पर्यायांतून शोधा.
(1) खादाडपणा करणे (2) मत्सर वाटणे
(3) पोटात वेगळेच व ओठात वेगळेच असणे (4) वडिलांपेक्षा बेटा कर्तबगार

**97.** वेसण घालणे – या म्हणीचा योग्य अर्थ खालील पर्यायांतून लिहा.
(1) वारंवार बजणून सांगणे (2) खूप दुःख देणे
(3) मर्यादा घालणे (4) हौस पुरवणे

**98.** पुढे दिलेल्या पर्यायांतून म्हण ओळखा.
(1) इंगा दाखवणे (2) ओहोटी लागणे
(3) कैवार घेणे (4) रोज मरे त्याला कोण रडे

**99.** खालील पर्यायात कोणती म्हण नाही ते ओळखा.
(1) रिकाम्या देवळावर कावळ्याची वस्ती (2) आकांडतांडव करणे
(3) ल्हान तोंडी मोठा घास (4) लंकेत सोन्याच्या विटा

**100.** खाली दिलेल्या वाक्यसंग्रहावर म्हण शोधून काढा.
"माधवराव मुळचेच स्वभावाने भिडस्त होते त्यामुळे लोक त्यांच्याकडून मागून नेलेली वस्तू किंवा पैसे त्यांना वरत करायचेच नाहीत. हळू हळू त्यांच्याकडे जे होते ते सर्व गेले. आणि एके दिवशी भीक मागण्याची पाळी माधवरावांवर आली."
(1) तुरत दान महापुण्य (2) भीक नको पण कुत्रे आवर
(3) भित्यापोटी ब्रह्मराक्षस (4) भिड भिकेची बहीण

**101.** 'शरणागती पत्करणे' – यासाठी पुढील कोणता वाक्प्रचार लागू पडणार नाही ?
(1) हत्यार खाली ठेवणे (2) नाक मुठीत धरणे
(3) दाती तृण धरणे (4) दडी मारणे

**102.** 'शहाण्याला शब्दाने सांगितले की, तो उमजतो पण मुर्खाला छडीशिवाय भागत नाही.' या संदर्भावरुन म्हण ओळखा.
(1) अति शहाणा त्याचा बैल रिकामा (2) शहाण्याला शब्दांचा मार
(3) छडी वाजे छम छम विद्या येई घम घम (4) शहाणे करून सोडावे सकळ जना

**103.** पुढील शब्दांतून प्रत्यय साधित शब्द ओळखा.

(1) अधिपती (2) अनुक्रम (3) उत्कर्ष (4) जनक

**104.** 'चोराच्या मनात चांदणे' या म्हणीला समानार्थी म्हण ओळखा.

(1) 'मन चिंती ते वैरी न चिंती' (2) 'ओळखीचा चोर जीवे न सोडी'

(3) 'खाई त्याला खवखवे' (4) 'असंगाशी संग प्राणाशी गाठ !'

**105.** संकेतार्थ नसलेले वाक्य ओळखा.

(1) चांगला अभ्यास केलास तर उत्तम यश मिळेल

(2) तू आता अभ्यास केलास तरी चालेल

(3) अभ्यास केला नाहीस तर नापास होशील

(4) मुलांनो, चांगला अभ्यास करा

**106.** 'समीरला वर्गात व्याख्यान देणं फार सोपं वाटायचं पण जेंव्हा तो प्राध्यापक झाला तेंव्हा त्याला वर्गात व्याख्यान देणं सोपं नसल्याचा अनुभव आला.' म्हणतात ना

(1) 'दुसऱ्याच्या डोळ्यातील कुसळ दिसते पण स्वतःच्या डोळ्यातील मुसळ दिसत नाही'

(2) 'दुरुन डोंगर साजरे'

(3) 'टाळीचे घाव सोसल्याशिवाय देवपण येत नाही'

(4) 'गुरुची विद्या गुरुस फळली'

**107.** हाक मारतांना नावापुढे कोणते विरामचिह्न वापराल ?

(1) , (2) ; (3) ! (4) ' '

**108.** 'नम्रतेने, विनयशीलतेने चांगल्या चांगल्या गोष्टी साध्य होतात.' हा अर्थ स्पष्ट करण्यासाठी पुढीलपैकी म्हण निवडा.

(1) 'प्रयत्नांती परमेश्वर' (2) 'दाम करी काम'

(3) 'मुंगी होऊन साखर खावी' (4) 'ताकाला जाऊन भांडे लपविणे'

**109.** वाक्याचा प्रकार ओळखा.

'अनर्थाला कारणीभूत असणारं आपलं अज्ञान दूर करण्यासाठी आपण झटू या.'

(1) केवल वाक्य (2) मिश्र वाक्य (3) संकेतार्थ (4) आज्ञार्थी

**110.** पुढे दिलेल्या चार पर्यायांपैकी एक म्हण ओळखा.

(1) अंगाचा तिळपापड होणे (2) जीव कासावीस होणे

(3) नाकापेक्षा मोती जड (4) यांपैकी एकही नाही

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**खालील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्रमांक 111 ते 115 ची उत्तरे लिहा :**

आपल्या भारतीय संस्कृतीत महाभारताचे स्थान आगळेच आहे. व्यास महर्षींनी लिहिलेल्या या महाकाव्याची थोरवी इतकी महान आहे की, आयुष्याच्या प्रत्येक टप्प्यावर आपण त्यापासून बोध घेऊ शकतो. महाभारताचा उत्कर्ष बिंदू म्हणजे कौरव-पांडवां मधील महायुद्ध. हे युद्ध लढले गेले कुरुक्षेत्रावर. प्राचीन काळात याच ठिकाणी वैदिक वाङ्मय लिहिले गेले. धार्मिक परंपरा, सामाजिक प्रथांचा उगमही याच ठिकाणी झाला. त्यामुळे या जागेला भारतीय संस्कृतीचे जन्मस्थान मानले जाते. महाभारतातील युद्धाच्या खाणाखुणा आजही भद्रकाली मंदिर, ब्रह्मसर, बाणगंगा, ज्योतिसार या ठिकाणी जपलेल्या आहेत. कुरुक्षेत्र हे 51 शक्तिपीठांपैकी एक पीठ आहे. महाभारतातील युद्धाचे सर्वात मोठे फलित म्हणजे 'श्रीमद्भगवद्गीता'. युद्धासाठी समोर उभे ठाकलेले आप्तस्वकीय पाहून गोंधळलेल्या अर्जुनाला धीर देऊन कर्मयोगाचा जो उपदेश भगवान श्रीकृष्णांनी केला, तो म्हणजे जगद्वंद्य 'भगवतगीता'. कुरुक्षेत्रावरील ज्योतीसार येथे भगवद्गीता सांगितल्याचे मानले जाते. ज्या वटवृक्षाखाली श्रीकृष्णाने हा उपदेश केला, तो वटवृक्ष आजही पाहायला मिळतो. याच ठिकाणी श्रीकृष्णाने आपले विराट रूप दर्शन देऊन तोच या जगाचा प्रतिपालक आहे आणि संहारकही आहे याची प्रचिती दिली.

कुरुक्षेत्रावर भगवान श्रीकृष्णाच्या बहुरंगी व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडविणारे संपन्न म्युझियमही आहे. प्राचीन कालखंडातील विविध हस्तलिखिते, चित्रे, शिल्पे, कलाकृती, उत्खननात सापडलेले अवशेष इथे ठेवलेले आहेत. कुरुक्षेत्राचे दर्शन घेतल्यानंतर आपण प्राचीन गौरवशाली परंपरेचा हिस्सा आहोत या विचाराने मन भरून येते.

---

**111.** महाभारताचा उत्कर्ष बिंदू कोणता ?

(1) भारतीय संस्कृती
(2) कुरुक्षेत्र
(3) व्यास महर्षी
(4) कौरव-पांडव महायुद्ध

---

**112.** भारतीय संस्कृतीचे जन्म स्थान कोणते ?

(1) भद्रकाली मंदिर
(2) बाणगंगा
(3) कुरुक्षेत्र
(4) ज्योतिसार

---

**113.** महाभारतातील युद्धाचे सर्वात मोठे फलित म्हणजे.

(1) कौरव-पांडव महायुद्ध
(2) भारतीय संस्कृती
(3) श्रीमद्भगवद्गीता
(4) धार्मिक परंपरा

---

**114.** श्रीकृष्णाने कुरुक्षेत्रावर कोणाला उपदेश केला ?

(1) कौरवांना
(2) पांडवांना
(3) गोंधळलेल्या अर्जुनाला
(4) आप्तस्वकीयांना

---

**115.** श्रीकृष्णाने आपले विराटरूप दर्शन देऊन कशाची प्रचिती दिली ?

(1) आप्तस्वकीय असल्याची
(2) जगाचा प्रतिपालक व संहारकही असल्याची
(3) गौरवशाली परंपरेची
(4) कर्मयोगाची

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**खालील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्रमांक 116 ते 120 ची उत्तरे लिहा :**

दुःखे येतात ती आपली कसोटी पाहण्यासाठीच येतात. त्यावेळी न डगमगणे हाच खरा पुरुषार्थ. भट्टीतून तावून सुलाखून निघाल्याखेरीज सोन्याला तेज चढत नाही किंवा टाकीचे घाव सोसल्याखेरीज दगडाला देवपण येत नाही, हे आपणाला माहीत नाही काय ? पैलू पाडल्याशिवाय हिऱ्यालासुद्धा किंमत येत नाही. आपणावर कोसळणारी दुःखे ही अशीच आपल्या व्यक्तिमत्त्वाला पैलू पाडण्यासाठी निर्माण झाली आहेत असे आपण का समजू नये ? शिवाय असे पाहा, जगात दुःखे आहेत म्हणून सुखाची किंमत आपणास कळते ना ? जगात अंधारी रात्र आहे म्हणूनच चंद्राला महत्त्व. त्याचप्रमाणे दुःख आहे म्हणूनच जगात सुखाचे महत्त्व आहे असे तुम्हाला नाही वाटत ? नुसते गोड जेवण जेवण्याचा तुम्ही कधी प्रयत्न केला आहे काय ? नुसत्या गोडाने तोंडाला कशी मिठी बसते, हे तुम्हाला माहीत आहेच. केवळ सुखच जगात असते तर अशीच आपली स्थिती झाली नसती का ? शिवाय दुःखानंतर सुख आले म्हणजे त्याची लज्जत काही न्यारीच असते असा अनुभव कुणाला नाही ? परीक्षेसाठी मरमर कष्ट केल्यानंतरच निकालाच्या आनंदाची खरी गोडी आपणास कळते. असे जर आहे तर वर्तमानकाळच्या दुःखाबद्दल आपण कुरकूर का करावी ? आणि दुःख पर्वताएवढे असे का मानावे ?

---

**116.** या उताऱ्यात पुरुषार्थ कशाला म्हटले आहे ?

(1) दुःख सहन करणे (2) दुःखात न डगमगणे

(3) दुःखात आपली परीक्षा होणे (4) यांपैकी एकही नाही

---

**117.** दगडाला देवपण कशामुळे येते ?

(1) टाकीचे घाव सोसल्याने (2) टाकीचे घाव घातल्याने

(3) दगडाची मूर्ती तयार केल्याने (4) मूर्तीची पूजा केल्याने

---

**118.** सुखाची किंमत कशामुळे कळते ?

(1) दुःख नसल्यामुळे (2) सुख प्राप्तीमुळे

(3) दुःखामुळे (4) सुख नसल्यामुळे

---

**119.** चंद्राला महत्त्व कुणामुळे प्राप्त होते ?

(1) सूर्यामुळे (2) प्रकाशामुळे (3) लोकांमुळे (4) अंधारामुळे

---

**120.** परीक्षेच्या निकालाच्या आनंदाची खरी गोडी कधी कळते ?

(1) परीक्षेसाठी मरमर कष्ट केल्यानंतरच (2) पुस्तकांचे वाचन करून परीक्षा दिल्यानंतर

(3) घरीच अभ्यास करून परीक्षा दिल्याने (4) अभ्यास न करताच परीक्षा दिल्याने

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

**खालील उतारा वाचून त्या खालील प्रश्न क्रमांक 121 ते 125 ची उत्तरे लिहा :**

जातीने मनुष्य श्रेष्ठ किंवा कनिष्ठ ठरतो, हा विचार सर्व संत-महंतांनी आणि विचारवंतांनी पुसून टाकण्याचा अखंड प्रयत्न केला आहे. संतांचे विचार आणि आचार समतेचे द्योतक आहेत. ज्याच्या मनात समता नाही आणि ममताही नाही, त्याला संतत्वाच्या आणि देवत्वाच्या जवळ जाण्याचा अधिकार कधीच लाभणार नाही. तोच खरा अस्पृश्य समजावा. ही विशाल आणि सर्वसमावेशक दृष्टी संतांच्या साहित्यातून प्रकट झाली आहे. 'भेदाभेद भ्रम अमंगळ' आणि 'जे जे भेटे भूत ते ते जाणिजे भगवंत' हा उदात्त विचार तर्कशुद्ध आहे. आपल्या खाद्यांवर जातीय उच्चनीचतेचे जे पिशाच्च शतकानुशतके ठाण मांडून बसले आहे, ते फेकून दिले पाहिजे, हे अनेक संतांनी गर्जून सांगितले आहे. परोपरीने सांगितले आहे. पण माणसाचा मुर्दाडपणा अलौकिक आहे. संतांच्या कपाळावर त्याने जाती-वर्णाची लेबले तत्परतेने आणि धूर्तपणे चिकटविली. खरे तर साधूंचीच काय सर्वसामान्यांचीही जात माणूसच असते, माणूसच असावी. माणसांची जाती वाढावी. मानव्याची उंची वाढत जावी; हे संतांचे स्वप्न आहे. पण हे घडत नाही; म्हणून संतांच्या वाणीला अनेक वेळा हुंदके फुटलेले आहेत.

---

**121.** वरील उताऱ्यात संतमहंतांनी कोणता प्रयत्न केल्याचे म्हटले आहे ?

(1) जातीने मनुष्य श्रेष्ठ वा कनिष्ठ ठरतो हा विचार रुजवण्याचा
(2) जातीने मनुष्य श्रेष्ठ वा कनिष्ठ ठरत नाही हा विचार रुजवण्याचा
(3) जातीने मनुष्य श्रेष्ठ ठरतो पण कनिष्ठ ठरत नाही हा विचार रुजवण्याचा
(4) जातीने मनुष्य श्रेष्ठ ठरत नाही पण कनिष्ठ ठरतो हा विचार रुजवण्याचा

---

**122.** संतांचे विचार आणि आचार कशाचे द्योतक आहेत ?

(1) संतांचे विचार आणि आचार समतेचे द्योतक नाहीत
(2) संतांचे विचार आणि आचार समतेचे द्योतक आहेत
(3) संतांचे विचार समतेचे द्योतक आहेत; परंतु आचार नाही
(4) संतांचा आचार समतेचे द्योतक आहे; परंतु विचार नाही

---

**123.** लेखकाच्या मते खरा संत कोण ?

(1) ज्याच्या मनात समता नाही मम आणि ममता नाही तो
(2) ज्याच्या मनात समता आणि ममता आहे तो
(3) ज्याच्या मनात समता आहे पण ममता नाही तो
(4) जो समता व ममताच्या पलीकडे आहे तो

---

**124.** वरील उताऱ्यात कोणता विचार तर्कशुद्ध असल्याचे म्हटले आहे ?

(1) अभेद भ्रम अमंगळ
(2) भेदाभेद भ्रम मंगळ
(3) भेदाभेद भ्रम अमंगळ
(4) यांपैकी कोणताच नाही

---

**125.** वरील उताऱ्यात संतांचे कोणते स्वप्न असल्याचे म्हटले आहे ?

(1) मानव्याची उंची वाढू नये
(2) माणसांच्या जातींत वाढ होत जावी
(3) मानव्याची उंची वाढत जावी
(4) मानव्याची उंची वाढू नये आणि माणसाच्या जातींत वाढ व्हावी

---

**कच्च्या कामासाठी जागा / SPACE FOR ROUGH WORK**

